**विधी अभ्यासक्रमाच्या प्रथम वर्षानंतर**
**<u>महाविद्यालय बदल करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विधी-२०१९/प्र.क्र.१३०/मशि-२,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०९ ऑक्टोबर, २०२०.

<u>वाचा</u> : १) सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २८,
२) शासन अधिसूचना क्र.सीईटी-२०१५/सीआर-२४३(भाग-२)/मशि-२, दि.०५.०५.२०१७,
३) संचालक उच्च शिक्षण पुणे यांचे पत्र क्र.विधी-३८२०/प्र.क्र.७२/सीईटी सेल/ ५९१०, दि. ११.०९.२०२०.

**<u>प्रस्तावना :-</u>**

संदर्भाधीन क्रमांक १ येथील अधिनियमातील कलम २३ अन्वये प्राप्त अधिकाराअंतर्गत संदर्भाधीन क्रमांक २ येथील अधिसूचनेन्वये "महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्था (पूर्णवेळ व्यावसायिक विधी पदवीपूर्व पाठ्यक्रमांच्या प्रवेशाचे विनियमन) नियम, २०१७ राजपत्रात प्रसिध्द करण्यात आले. सदर नियमातील नियम १६ मध्ये पहिल्या वर्षानंतर पाठ्यक्रम किंवा संस्था बदलणे संबंधी तरतुदी केल्या आहेत. संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये संचालक उच्च शिक्षण पुणे यांनी, अधिनियमाच्या कार्यकक्षेबाहेरील व्यावसायिक शिक्षण संस्थेतील उमेदवारांना शैक्षणिक वर्ष २०२०-२१ मध्ये द्वितीय वर्षाकरीता अधिनियमाच्या कार्यकक्षेतील मुंबई विद्यापीठ संचालित विधी महाविद्यालयामध्ये बदल करण्यासंबंधी मार्गदर्शन करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार सदर प्रकरणी करावयाच्या कार्यवाहीबाबत निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

"महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्था (पूर्णवेळ व्यावसायिक विधी पदवीपूर्व पाठ्यक्रमांच्या प्रवेशाचे विनियमन) नियम, २०१७" मधील नियम १६ मधील तरतुदीनुसार शैक्षणिक वर्ष २०२०-२१ मध्ये द्वितीय वर्षाकरीता मुंबई विद्यापीठाचे युनिव्हर्सिटी ऑफ मुंबई लॉ ॲकेडमी, मुंबई या महाविद्यालयामध्ये संस्था बदलीने प्रवेश देण्यासंबंधी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे निर्देश देण्यात येत आहे :-

(अ) सदर महाविद्यालय बदलीसाठी प्राप्त झालेल्या अर्जांपैकी "महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्था (पूर्णवेळ व्यावसायिक विधी पदवीपूर्व पाठयक्रमांच्या द्यावयाच्या प्रवेशाचे विनियमन) नियम, २०१७ मधील नियम १६ मधील तरतुदीनुसार पात्र ठरणाऱ्या उमेदवारांना प्रथम महाविद्यालय बदलून देण्यात यावे,

(ब) त्यानंतरही जागा रिक्त राहत असेल, तर नियम १६ (४) मधील तरतुदीनुसार अधिनियमाच्या कार्यकक्षेबाहेरील व्यावसायिक शिक्षण संस्थेतील उमेदवारांकडून प्राप्त अर्जाबाबत, सदर महाविद्यालय विनाअनुदानित असल्याने व रिक्त जागांवर प्रवेश होण्यासाठी, खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

(१) संबंधित उमेदवाराने राज्य सामाईक प्रवेश परिक्षा कक्षाकडून घेण्यात आलेली विधी अभ्यासक्रमाची सामाईक प्रवेश परिक्षा (CET) दिलेली असावी.

(२) संबंधित उमेदवारास, सदर महाविद्यालयात संबंधित शैक्षणिक वर्षात प्रवेशित उमेदवारांपैकी शेवटच्या उमेदवारास (उमेदवार ज्या प्रवर्गातील आहे त्या प्रवर्गातील उमेदवारास) सामाईक प्रवेश परिक्षेत प्राप्त गुणापेक्षा कमी गुण नसावे.

(३) महाविद्यालय बदलीसाठी आवश्यक त्या सर्व कागदपत्रांची / परवानगीची पूर्तता करण्यात आलेली असावी.

(४) ज्या महाविद्यालयातून उमेदवार येणार आहे, त्या महाविद्यालयाचे नॅक मुल्यांकन सदर महाविद्यालयाच्या नॅक मुल्यांकनापेक्षा कमी नसावे. महाविद्यालयाचे नॅक मुल्यांकन झाले नसल्यास विद्यापीठाचे नॅक मुल्यांकन विचारात घेण्यात यावे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२०१००९१२०८१२७४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANISHA PRAVIN KINI

Digitally signed by MANISHA PRAVIN KINI
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, serialNumber=be59abce2e8b3a2f8b88d3cb21bee92fd81e2ed85d5357c0a88629268305fca7, cn=MANISHA PRAVIN KINI
Date: 2020.10.09 12:45:56 +05'30'

**( म. प्र. किणी )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०० ००१,
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ (संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत),
४. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
७. निवड नस्ती/मशि-२.